कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाचा सन २०१९-२० चा अनुसूचित जाती प्रवर्गाचा अखर्चित निधी पुनर्जिवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देणे व रु.१७०० लक्ष निधीचे वितरण करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०५२०/प्र.क्र.५४ (भाग-२)/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २० ऑगस्ट, २०२०

**संदर्भ:-**

१. शासन परिपत्रक: वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०
२. केंद्र शासनाचे पत्र क्र.३-१ (Revalidation)/२०१५- M&T (आय ॲण्ड पी), दि. २० एप्रिल, २०२०
३. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र/कृ.यां.उ.अ/२०२०-२१/गुनि-५/१२६८/२०२०,दि.११ मे, २०२०
४. सामाजिक न्याय विभागाचा शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२०/प्र.क्र.०३/अर्थसंकल्प (विघयो), दि. २९ जुलै, २०२०

**प्रस्तावना:**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजनेंतर्गत-कृषि यांत्रिकीकरण उप-अभियान राबविण्यात येत असून त्यात केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे ६०: ४० प्रमाण आहे. केंद्र शासनाने या योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये केंद्र हिश्श्यापोटी रु.७५०० लक्ष निधी राज्यास उपलब्ध करुन दिला होता तथापि, वर्षअखेर या निधीपैकी रु.२९०७.९५४ लक्ष निधी अखर्चित राहिला होता. सदर निधी सन २०२०-२१ मध्ये खर्च करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधिन दि. २० एप्रिल, २०२० च्या पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे. या अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अनुक्रमे रु.४०७.९५४ लक्ष, रु.२५०० लक्ष व रु.१००० लक्ष निधीचा समावेश आहे.

सन २०१९-२० या वर्षातील अनुसूचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अखर्चित रु.१५०० लक्ष निधीपैकी रु.१२०० लक्ष व राज्य हिश्श्याचा रु.५०० लक्ष असा एकूण रु.१७०० लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाचा अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०१९-२० या वर्षातील केंद्र हिश्श्याचा अखर्चित रु.१५०० लक्ष निधी (अक्षरी रुपये पंधरा कोटी फक्त) सन २०२०-२१ मध्ये खर्च करण्यासाठी पुनर्जिवित करुन त्यापैकी रु.१२०० लक्ष (अक्षरी रुपये बारा कोटी फक्त) व राज्य हिश्श्याचा रु.५०० लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) असा एकूण रु.१७०० लक्ष (अक्षरी रुपये

सतरा कोटी फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च झाल्यानंतर आवश्यकतेनुसार उर्वरित निधी वितरणाचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

३. सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ च्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमांक- एन - ३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>७८९ - अनुसूचित जाती उप-योजना,<br>(०१)(११) कृषि उन्नती योजना- कृषि यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो) (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१बी१८८),<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक- एन - ३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>७८९ - अनुसूचित जाती उप-योजना,<br>(०१)(१२) कृषि उन्नती योजना- कृषि यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो) (राज्य हिस्सा ४०%) (२४०१ बी१९७),<br>३३ अर्थसहाय्य |

४. निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५. उपलब्ध निधी फक्त अनुसूचित जाती/नवबौद्ध प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. अनुदानाची रक्कम योजनेकरिता उघडलेल्या PFMS बँक खात्यातून DBT प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपद्धती अनुसरुन, सर्व वित्तीय कायदे/ नियमांचे/ प्रकियांचे व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन निर्णयाचा वा परिपत्राचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

९. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

१०.सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०६/२०२०/व्यय-१ दि.६ जुलै,२०२० अन्वये तसेच सामाजिक न्याय विभागाने संदर्भाधीन दि.२९ जुलै, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२०१४५७५३८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.08.20 15:04:39 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्य मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
३. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय,पुणे
६. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
७. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. सर्व संचालक /सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१२.महालेखाकार (स्थानिय निकाय) लेखा परिक्षा व लेखा, प्रतिष्ठा भवन,महर्षी कर्वे मार्ग, मुंबई.
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१५.नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
१६.वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१७.निवड नस्ती (कार्यासन -१४अे).